**जागतिक बॅंकेच्या माध्यमातून राज्यात राबविण्यात येणा-या महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पाकरिता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -बासप्र-०६१०/प्र.क्र.१४१/२१-स**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२**
**दिनांक : ३०/०३/२०११**

**वाचा - १. शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृबास-२००७/प्रक्र.४०/११-स, दि.३१ डिसेंबर,२००७**
**२. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प,पुणे यांचा प्रस्ताव जा.क्र. एमएसीपी/सीएफ़सी/बजेट/४४३/२०११, दिनांक २९/०३/२०११**

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र शासनामार्फत जागतिक बॅक्केच्या सहकार्याने राज्यामध्ये महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प राबविण्यात येत आहे. या प्रकल्पाच्या उभारणी व अंमलबजावणीसाठी प्रकल्प समन्वयन कक्ष व प्रकल्प अंमलबजावणी कक्षाची स्थापना करण्यात आली असून तेथे प्रतिनियुक्तीने अधिकारी व कर्मचारी यांची नियुक्ती करण्यात आलेली आहे. या प्रकल्पास जागतिक बँकेने मान्यता प्रदान केली असून प्रकल्पाकरिता दिनांक २०.१२.२०१० पासून कर्ज उपलब्ध (Loan Effectivness) करुन दिलेले आहे. प्रकल्प समन्वयन कक्षामार्फत संदर्भ क्र. २ अन्वये सन २०१०-११ करिता प्रकल्पासाठी रु १००५ लाख निधी उपलब्ध करुन देण्याबाबत प्रस्ताव प्राप्त झाला असून त्यानुषंगाने सदर निधी प्रकल्पांतर्गत सहभागी असणा-या विभागांना तसेच प्रकल्पामध्ये सहभागी असणा-या त्या-त्या विभागांच्या अधिनस्त यंत्रणांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे-

**शासन निर्णयः-**

१. राज्यात महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पाकरीता सन २०१०-११ करीता रू. १००५ लाख निधी पुढीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. राज्य शासनाच्या या प्रकल्पातील वाटयाकरिता रु. ८० लाख (रू. ऐंशी लाख फक्त ) निधी पुढील लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

मागणी क्र. व्ही-५,
मुख्य लेखाशीर्ष ६४२५-सहकारासाठी कर्जे,
(००)(१०८), इतर सहकारी संस्थांना कर्जे,
(०१)(१८) महाराष्ट्र स्पर्धात्मक कृषि विकास प्रकल्प,
(जागतिक बँकेचे कर्ज )(६४२५-०६३-६) (राज्य हिस्सा)
५५, कर्जे व आगाऊ रकमा

सदर रु. ८० लाख (रू. ऐंशी लाख फक्त ) निधीपैकी रू. २८.५० लाख (रू. अठठावीस लाख पन्नास हजार फक्त ) निधी कृषि विभागास **अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे** उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. आयुक्त (कृषि) यांनी सदर रु. २८.५० लाख (रू. अठठावीस लाख पन्नास हजार फक्त ) रकमेपैकी

रू. २६.५० लाख (रू. सव्वीस लाख पन्नास हजार फक्त) निधी प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यातील १० जिल्ह्यांच्या 'आत्मा' या संस्थेकरीता व रू. २.० लाख निधी (रू. दोन लाख फक्त) 'वनामती' या संस्थेकरीता उपलब्ध करुन द्यावेत. सदर निधीचा विनियोग 'आत्मा' मार्फत राबवावयाच्या विस्तार कार्यक्रमास तसेच 'वनामती' या संस्थेच्या बळकटीकरणाबाबत या प्रकल्पामध्ये समाविष्ट केलेल्या घटकांकरिता करण्यात यावा.

उपरोक्त रु. ८० लाख (रू. ऐंशी लाख फक्त) निधीपैकी उर्वरित रक्कम रु. ५१.५० लाख ( रू. एक्कावन्न लाख पन्नास हजार फक्त) निधीतुन प्रकल्पात सहभागी असणा-या यंत्रणांच्या प्रमुखांना खालीलप्रमाणे दर्शविलेल्या रकमा **धनाकर्ष /धनादेशाव्दारे** वितरीत कराव्यात.

| अ. क्र. | प्रकल्पांतर्गत सहभागी यंत्रणा | यंत्रणा प्रमुख | वितरीत करावयाचा निधी (रूपये लाखात) |
|---|---|---|---|
| १ | प्रकल्प व्यवस्थापन यंत्रणा | प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि-विकास प्रकल्प, पुणे. (Project Director, Maharashtra Agricultural Competitiveness Project , Pune.) | १९ (रू. एकोणीस लाख फक्त) |
| २ | प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा (पणन) | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे. (Managing Director, Maharashtra State Agricultural Marketing Board, Pune.) | १२.५० (रू. बारा लाख पन्नास हजार फक्त) |
| ३ | महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे ( Managing Director, Maharashtra State Warehousing Corporation, Pune) | २० (रू. वीस लाख फक्त) |
| **एकूण** | | | **५१.५०** ( रू. एक्कावन्न लाख पन्नास हजार फक्त) |

३. या प्रकल्पातील जागतिक बँकेच्या वाटा म्हणून केंद्र शासनामार्फत प्राप्त होणारा रु. ९२५ लाख (रू. नऊशे पंचवीस लाख फक्त) निधी पुढील लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

मागणी क्र. व्ही-५,
मुख्य लेखाशीर्ष ६४२५-सहकारासाठी कर्जे,
(००)(१०८), इतर सहकारी संस्थांना कर्जे,
(०१)(२१) महाराष्ट्र स्पर्धात्मक कृषि विकास प्रकल्प,
(जागतिक बँकेचे कर्ज ) (६४२५-०६८-१) (बाह्य सहाय्य)
५५, कर्जे व आगाऊ रकमा

सदर रु. ९२५ लाख (रू. नऊशे पंचवीस लाख फक्त) रकमेपैकी रु. ३३४.०७ लाख (रू. तीनशे चोतीस लाख सात हजार फक्त) निधी कृषि विभागास **अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे** उपलब्ध करुन देण्यात येत आहेत. आयुक्त (कृषि) यांनी सदर रु. ३३४.०७ लाख (रू. तीनशे चोतीस लाख सात हजार

फक्त ) रकमेपैकी रू. ३०८.२७ लाख (रू. तीनशे आठ लाख सत्तावीस हजार फक्त ) निधी प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यातील १० जिल्ह्यांच्या 'आत्मा' या संस्थेकरीता व रू. २५.८० लाख निधी (रू. पंचवीस लाख ऐंशी हजार फक्त ) 'वनामती' या संस्थेकरीता उपलब्ध करुन द्यावेत. सदर निधीचा विनियोग 'आत्मा' मार्फत राबवावयाच्या विस्तार कार्यक्रमास तसेच 'वनामती' या संस्थेच्या बळकटीकरणाबाबत या प्रकल्पामध्ये समाविष्ट केलेल्या घटकांकरिता करण्यात यावा.

तसेच उपरोक्त रु. ९२५ लाख (रू. नऊशे पंचवीस लाख फक्त ) रकमेपैकी उर्वरित रक्कम रु. ५९०.९३ लाख ( रू. पाचशे नव्वद लाख त्र्याण्णव हजार फक्त ) निधीतुन प्रकल्पात सहभागी असणा-या यंत्रणांच्या प्रमुखांना खालीलप्रमाणे दर्शविलेल्या रकमा **धनाकर्ष /धनादेशाव्दारे** वितरीत कराव्यात.

| अ. क्र. | प्रकल्पांतर्गत सहभागी यंत्रणा | यंत्रणा प्रमुख | वितरीत करावयाचा निधी (रूपये लाखात) |
|---|---|---|---|
| १ | प्रकल्प व्यवस्थापन यंत्रणा | प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि-विकास प्रकल्प, पुणे. (Project Director, Maharashtra Agricultural Competitiveness Project , Pune.) | २२५.१५ (रू. दोनशे पंचवीस लाख पंधरा हजार फक्त) |
| २ | प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा (पणन) | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे. (Managing Director, Maharashtra State Agricultural Marketing Board, Pune.) | १४७.१८ (रू. एकशे सत्तेचाळीस लाख अठरा हजार फक्त) |
| ३ | महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे ( Managing Director, Maharashtra State Warehousing Corporation, Pune) | २१८.६० (रू. दोनशे अठरा लाख साठ हजार फक्त) |
| | | **एकूण** | **५९०.९३** ( रू. पाचशे नव्वद लाख त्र्याण्णव हजार फक्त ) |

४. सदर रक्कम महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पांतर्गत सहभागी असणा-या उपरोक्त अनु. क्र. २ व ३ येथे नमूद केल्याप्रमाणे सर्व यंत्रणांना निधी वितरीत करण्यासाठी श्री. ना. ल. तडोसे, सह सचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून व श्री. य. गं. पाटील, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून शासनाच्यावतीने प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. या प्रकल्पामध्ये सहभागी असणा-या कृषि विभागास उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना प्रकल्पांतर्गत नियंत्रण अधिकारी व सहायक संचालक, लेखा-१, कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेला निधी, त्यांनी या प्रकल्पांतर्गत प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यातील १० जिल्ह्यांच्या 'आत्मा' या संस्थेकरीता व कृषि विभागाच्या अधिपत्याखालील 'वनामती' या संस्थेकरीता प्रस्तावीत करण्यात आलेल्या उपघटकांच्या अंमलबजावणीकरीता अनु. क्र. २ व ३ येथे नमुद

केल्याप्रमाणे निधी उपलब्ध करुन द्यावा. तसेच व्यवस्थापकीय संचालक (महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ) तथा प्रमुख, प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा (पणन) यांना उपलब्ध करुन दिलेला निधी त्यांनी या प्रकल्पांतर्गत स्थापण्यात आलेल्या प्रकल्प अंमलबजावणी यंत्रणा (पणन) यांना उपलब्ध करुन द्यावा.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर निधीचा विनियोग प्रकल्पांतर्गत मंजूर घटकांच्या / उपघटकांच्याच (Components / Sub-components) अंमलबजावणीकरीता मंजूर खर्च मर्यादेमध्येच व प्रकल्पामध्ये विहीत केलेल्या पद्धतीनेच करण्यात येत असल्याबाबतची खात्री प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि-विकास प्रकल्प यांनी तसेच आयुक्त (कृषि), व्यवस्थापकीय संचालक (महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ) व व्यवस्थापकीय संचालक (महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ) यांनी करावी आणि यासंदर्भातील अनुपालन अहवाल आणि निधी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

७. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि-विकास प्रकल्प यांनी प्रकल्पामध्ये समाविष्ट असलेल्या सर्व विभागांच्या यंत्रणांमार्फत होणारा खर्च प्रकल्पांतर्गत समाविष्ट घटकांवर मंजूर खर्च मर्यादेमध्येच व प्रकल्पामध्ये विहीत केलेल्या पद्धतीनेच खर्च होत असल्याबाबत खात्री करावी व त्याचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा. त्याचप्रमाणे प्रकल्प संचालकांनी प्रकल्पामधील राज्य शासन, जागतीक बॅंक व लाभार्थ्यांच्या खर्च करावयाच्या निधीबाबत विहीत वाट्याचे काटेकोर पालन होईल याची खबरदारी घ्यावी.

८. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८०/११/ व्यय-२, दि.२८/३/२०११ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०११०३३०११३३३६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-

(श्रीकांत चं. आंडगे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

**प्रति:**

(१) महामहीम राज्यपाल यांचे सचिव.
(२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
(३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
(४) मा. मंत्री (कृषी व पणन / पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव. मंत्रालय, मुंबई.
(५) मा. राज्य मंत्री (कृषी / पणन / पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव. मंत्रालय, मुंबई.
(६) प्रधान सचिव (कृषी / पणन / पशुसंवर्धन /वित्त/नियोजन), मंत्रालय, मुंबई.
(७) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य , पुणे.
(८) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे.
(९) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प, पुणे.
(१०) कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
(११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे.
(१२) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य
(१३) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य
(१४) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी तथा सदस्य सचिव (ATMA), महाराष्ट्र राज्य (:अमरावती, अकोला, वाशीम, यवतमाळ, बुलढाणा, जालना, औरंगाबाद, परभणी, हिंगोली, अहमदनगर)

(१५)	सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी  संस्था , महाराष्ट्र राज्य
(१६)	महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
(१७)	महालेखापाल, महाराष्ट्र २, नागपूर (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
(१८)	निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
(१९)	अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
(२०)	जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
(२१)	कक्ष अधिकारी / अवर सचिव, (१७-स / रोखशाखा / २२-स), स.प. व व. विभाग, मंत्रालय, मुंबई
(२२)	कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प १३ / व्यय-२) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
(२३)	निवड नस्ती.

***